**दि. ३० ऑक्टोबर, २०२१ रोजी होणाऱ्या देगलूर विधानसभा पोटनिवडणुकासाठी सदर क्षेत्रातील मतदारांना मतदानाच्या दिवशी मतदान करण्यासाठी सुट्टी अथवा दोन तासांची सवलत देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग,**
**शासन परिपत्रक क्रमांक: मतदान २०२१/प्र.क्र. १८६/कामगार-९**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक : २२ ऑक्टोबर, २०२१.

संदर्भ :- भारत निवडणूक आयोग यांचे क्रमांक ECI/PN/८३/२०२१, दि.२८ सप्टेंबर, २०२१ रोजीचे प्रसिध्दी पत्रक.

**शासन परिपत्रक-**

आपल्या देशाने लोकशाही पध्दती स्विकारली असून १८ वर्षावरील नोंदणी झालेल्या सर्व नागरिकांनी प्रत्येक निवडणुकीमध्ये १०० टक्के मतदान करणे अपेक्षित आहे. ही बाब लक्षात घेता लोकप्रतिनिधीत्व कायदा, १९५१ (भाग-२) मधील नियम १३५ (ब) नुसार मतदानाच्या दिवशी सर्वसाधारणपणे मतदारांना त्यांचा मतदानाचा हक्क बजावता यावा यासाठी भरपगारी सुट्टी देण्यात येते किंवा काही ठिकाणी कामाच्या तासात योग्य ती सवलत देण्यात येते. मात्र गेल्या काही निवडणुकांमध्ये असे दिसून आले आहे की, संस्था/ आस्थापना इ. भरपगारी सुट्टी किंवा सवलत देत नाहीत. यामुळे अनेक मतदारांना त्यांच्या मतदानापासून वंचित रहावे लागते, जे लोकशाहीसाठी अत्यंत घातक आहे.

२. भारत निवडणूक आयोगाने निर्गमित केलेल्या आदेशाप्रमाणे महाराष्ट्रातील ९०- देगलूर (अ.जा.) विधानसभा मतदारसंघामध्ये दि. ३० ऑक्टोबर, २०२१ रोजी पोटनिवडणूक घेतली जाणार आहे. सदर निवडणुकीमध्ये सर्व मतदारांना त्यांचा मतदानाचा हक्क योग्यरितीने बजावता यावा यासाठी खालील प्रमाणे आदेश देण्यात येत आहेत:-

I) निवडणूक होणाऱ्या मतदान क्षेत्रात मतदार असलेले कामगार/अधिकारी/कर्मचारी यांना मग ते कामानिमित्त निवडणूक होणाऱ्या क्षेत्राबाहेर कार्यरत असले तरीही त्यांना निवडणुकीच्या दिवशी मतदानाचा हक्क बजावण्यासाठी भरपगारी सुट्टी देण्यात यावी.

II) सदर सुट्टी उद्योग, ऊर्जा व कामगार विभागांतर्गत येणाऱ्या सर्व आस्थापना, कारखाने, दुकाने इत्यादींना लागू राहील (उदा.खाजगी कंपन्या या मधील आस्थापना, सर्व दुकाने व इतर आस्थापना, निवासी हॉटेल, खाद्यगृहे, नाटयगृहे, व्यापार, औद्योगिक उपक्रम किंवा इतर आस्थापना तसेच माहिती व तंत्रज्ञान कंपन्या, शॉपिंग सेंटर, मॉल्स, रिटेलर्स इ.)

III) अपवादात्मक परिस्थितीत कामगार, अधिकारी, कर्मचारी इत्यादींना पूर्ण दिवस सुट्टी देणे शक्य नसेल तर, मतदान क्षेत्रातील कामगारांना मतदानाचा हक्क बजावण्यासाठी सुट्टी ऐवजी कमीत कमी दोन तासांची सवलत देता येईल. मात्र त्याबाबत त्यांनी संबंधित जिल्हाधिकारी तथा जिल्हा निवडणूक अधिकारी यांची पूर्व परवानगी घेणे आवश्यक राहिल.

कोणत्याही परिस्थितीत मतदारांना मतदानासाठी किमान दोन तासांची सवलत मिळेल याची दक्षता संबंधित आस्थापना मालकांनी घेणे आवश्यक राहिल.

IV) वर नमूद केल्यानुसार उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाअंतर्गत येणाऱ्या सर्व आस्थापना, कारखाने, दुकाने इत्यादींच्या मालकांनी/व्यवस्थापनाने वरील सूचनांचे योग्य ते अनुपालन होईल याची काटेकोरपणे खबरदारी घ्यावी. मतदारांकडून मतदानाकरिता सुट्टी अथवा योग्य ती सवलत प्राप्त न झाल्याने मतदान करता येणे शक्य झाले नाही अशा प्रकारची तक्रार आल्यास, संबंधितांविरुध्द योग्य कारवाई करण्यात येईल.

३. सदर परिपत्रक भारत निवडणूक आयोग यांचे क्रमांक ECI/PN/८३/२०२१, दि. २८ सप्टेंबर, २०२१ रोजीच्या प्रसिध्दीपत्रकास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२११०२२१६३२५०३९१० असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by Dadasaheb Sopan Khatal
Date: 2021.10.22 16:37:18 +05'30'

**(दादासाहेब सो.खताळ)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत**- उपरोक्त परिपत्रक सर्व संबंधित आस्थापनांच्या निदर्शनास आणण्याच्या विनंतीसह अग्रेषित.

१. राज्य निवडणूक आयोग, महाराष्ट्र,नवीन प्रशासकीय इमारत, मंत्रालयासमोर, मुंबई-३२
२. प्रधान सचिव व मुख्य निवडणूक अधिकारी, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
३. कामगार आयुक्त, वांद्रे, मुंबई-५१ (निवडणूक होणाऱ्या ठिकाणी संबंधितांना सुचना देण्याबाबत कार्यवाहीच्या विनंतीसह अग्रेषित)
४. संचालक, औद्योगिक सुरक्षा व आरोग्य संचालनालय, वांद्रे, मुंबई (निवडणूक होणाऱ्या ठिकाणी संबंधितांना सुचना देण्याबाबत कार्यवाहीच्या विनंतीसह अग्रेषित)
५. संचालक, बाष्पके, वांद्रे, मुंबई, (निवडणूक होणाऱ्या ठिकाणी संबंधितांना सुचना देण्याबाबत कार्यवाहीच्या विनंतीसह अग्रेषित)
६. आयुक्त, नांदेड, महाराष्ट्र राज्य.
७. जिल्हाधिकारी, नांदेड,महाराष्ट्र राज्य.
८. महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई यांना व्यापक प्रसिध्दी देण्याच्या विनंतीसह अग्रेषित.
९. कामगार विभागातील सर्व कार्यासने

**प्रत माहितीसाठी :**

१. मा. मंत्री (कामगार) यांचे खाजगी सचिव
२. मा. राज्यमंत्री (कामगार) यांचे खाजगी सचिव
३. मा. मुख्य सचिव यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई